महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ
मधील जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील
बदलीबाबत.. डॉ. एच.ए. पाटोळे

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायप्र २०१३/प्र.क्र. ६०८ /सेवा-२**
गो.ते.रुग्णालय इमारत संकुल ,१० वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : २ सप्टेंबर, २०१४.

**संदर्भ :-** शासन आदेश सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. बदली-२०१३/प्र.क्र.२७०(७)/सेवा-२, दि. १५.१०.२०१३

**शासन निर्णय -**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील डॉ.एच.ए. पाटोळे यांची संदर्भाधिन दिनांक १५.१०.२०१३ च्या शासन निर्णयान्वये जिल्हा आरोग्य अधिकारी जिल्हा परिषद, रायगड या पदावरुन सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग), रत्नागिरी येथे बदलीने पदस्थापना करण्यात आली होती. डॉ. पाटोळे यांनी सदर बदली आदेशाच्या अनुषंगाने मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्रमांक १०४२/२०१३ दाखल केला होता. सदर मूळ अर्जावरील सुनावणी दरम्यान मा.न्यायाधिकरणाने दिनांक ९.५.२०१४ च्या आदेशानुसार डॉ. पाटोळे यांचे दिनांक १५.१०.२०१३ चे बदली आदेश रद्द ठरविल्याने महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील कलम ४ (४) (एक) (दोन) व ४ (५) मधील तरतुदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने डॉ.पाटोळे यांचे संदर्भिय दिनांक १५.१०.२०१३ चे बदली आदेश रद्द करण्यात येत आहे.

२. हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१४०९०२११४४४२७८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

JADHAV RAMCHANDRA S

Digitally signed by JADHAV RAMCHANDRA S
DN: CN = JADHAV RAMCHANDRA S, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = PHD
Date: 2014.09.02 13:46:13 +05'30'

(रा.शं.जाधव)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड

२) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई
४) उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे/कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर
५) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
७) जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
८) जिल्हा आरोग्य अधिकारी,जिल्हा परिषद, रत्नागिरी
९) सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग), रत्नागिरी
१०) डॉ. एच.ए.पाटोळे, जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड
११) मा. मंत्री / मा.राज्यमंत्री ( सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण) यांचे खाजगी सचिव
१२) मा.प्रधान सचिव (सा.आ.),मंत्रालय,मुंबई यांचे स्वीय सहायक
१३) निवडनस्ती